अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी संवर्गात तदर्थ पदोन्नतीने पदस्थापना देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन आदेश क्रमांक : मविसे-१०१८/प्र.क्र.२६/२०१८/आस्था-३,

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, मुंबई - ४०० ००१.
दिनांक: १३ जून,२०१८.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील निवडश्रेणी उप मुख्य कार्यकारी अधिकारी या संवर्गातील खालील अधिकाऱ्यांना या आदेशान्वये अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी / प्रकल्प संचालक पदावर (पीबी-३ वेतनश्रेणी रुपये १५६००-३९१०० ग्रेड वेतन रुपये ७६००) तदर्थ पदोन्नतीने खालील तक्त्यात त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र.३ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी पदस्थापना देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव, सध्याचे पदनाम व ठिकाण | तदर्थ पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण | **शेरा** |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १. | श्री.एम.एन.दिवे, सहायक आयुक्त (चौकशी), विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण विभाग, नवी मुंबई. | प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जिल्हा पालघर. | रिक्त पदी. |
| २. | श्री.व्ही.एस.मुळीक, उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रापं), जिल्हा परिषद परभणी. | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी. | रिक्त पदी. |
| ३. | श्री.आर.बी.सोमवंशी, उप संचालक (नॉन-इन्टेंसिव्ह), महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, नवी मुंबई. | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नंदुरबार. | रिक्त पदी. |
| ४. | श्री.एस.डी.जोशी, गट विकास अधिकारी, पंचायत समिती खानापूर-विटा जिल्हा सांगली. | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर. | रिक्त पदी. |

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव, सध्याचे पदनाम व ठिकाण | तदर्थ पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण | **शेरा** |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| ५. | श्री.एस.व्ही.कवडे, प्रशासक (नागपूर), सिडको, नागपूर. | प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जि.औरंगाबाद | श्री.ए.एम.देशमुख यांचे दि.२.११.२०१७ रोजीचे बदली आदेश रद्द करुन. |
| ६. | श्री.सी.एन.वाघमारे, उप मुख्य कार्यकारी अधिकारी (साप्र), जिल्हा परिषद रायगड. | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, चंद्रपुर. | रिक्त पदी |
| ७. | श्री.एस.जी.माळोदे, सहायक आयुक्त (विकास), विभागीय आयुक्त कार्यालय, नाशिक. | प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जि.नंदूरबार | रिक्त पदी |

२. वरील अधिकाऱ्यांना देण्यात आलेली तदर्थ पदोन्नती ही खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-

१) सदर तदर्थ पदोन्नती केवळ ११ महिन्यांसाठी देण्यात येत आहे. तद्नंतर नियमित निवडसूचीत समावेशनाबाबत अथवा तदर्थ पदोन्नतीस मुदतवाढ देण्याबाबत प्रस्ताव सादर करण्याच्या अधीन राहील. सदर तदर्थ पदोन्नतीवर कायम स्वरुपी धारणाधिकार राहणार नाही.

२) अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी / उप आयुक्त / प्रकल्प संचालक या संवर्गातील प्रतिनियुक्तीवर कार्यरत अधिकारी मूळ संवर्गात प्रतिनियुक्तीवरुन परत आल्यास आवश्यतेनुसार निवड सूचीतील कनिष्ठतम अधिकाऱ्यास पदावनत करण्यात येईल.

३) वरील अधिकाऱ्यांना देण्यात येणारी तदर्थ पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहील.

४) सदर तदर्थ पदोन्नती मा .उच्च न्यायालय, मुंबई येथे प्रलंबित असलेल्या रिट याचिका क्र.८४५२/२००४ मधील T.A. १/२०१४ आणि T.A. २/२०१४ तसेच रिट याचिका क्र.२७९७/२०१५ न्यायालयीन प्रकरणामध्ये होणाऱ्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहील.

५) सदर पदोन्नती आस्थापना मंडळ क्र.२ च्या बैठकीच्या इतिवृत्तामधील नमूद अटी व शर्तींच्या अधीन राहून व मा.उच्च न्यायालय, मुंबई येथील रिट याचिका क्र.२७९७/२०१७ (स्टॅम्प

क्र.७२५६/२०१५) महाराष्ट्र राज्य विरुध्द विजय घोगरे व इतर तसेच इतर संलग्न न्यायालयीन प्रकरणात दिनांक ४.८.२०१७ रोजी दिलेला अंतिम निर्णय व त्याविरुध्द मा.सर्वोच्च न्यायालयामध्ये दाखल केलेल्या विशेष अनुमती याचिका (डायरी क्र.३३१५१/२०१७) या याचिकेबाबत मा.सर्वोच्च न्यायालयाच्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

६) सदर तदर्थ पदोन्नती ही जे अधिकारी ज्येष्ठ आहेत , परंतु ज्यांची प्रकरणे विचारार्थ खुली ठेवण्यात आली आहेत, अशा अधिकाऱ्यांच्या ज्येष्ठतेस बाधा न आणता देण्यात येत आहे.

३. संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी तदर्थ पदोन्नतीने नियुक्ती देण्यात आलेल्या वरील अधिकाऱ्यांना स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन , तात्काळ कार्यमुक्त करावे आणि नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ हजर होण्याबाबत संबंधितांना सूचना द्याव्यात . तसेच संबंधित अधिकाऱ्यांनी पदभार स्वीकारल्यानंतर त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

४. तदर्थ पदोन्नतीने नियुक्ती दिलेल्या अधिकाऱ्यांनी त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे. त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. यासंदर्भात त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.सीडीआर-१०८२/२५६७/२८/११, दिनांक ३०.८.१९८२ अन्वये दिलेल्या सूचनांकडे वेधण्यात येत आहे. तसेच तदर्थ पदोन्नतीने दिलेली नियुक्ती रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाचे आवेदन करु नये. तसे केल्यास सदर अधिकारी शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१२११२१४५३४२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vijay Dattatraya Shinde

Digitally signed by Vijay Dattatraya Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fabf0ce38fdf553beb949764920592a97832b6399cb7060200d032e127e455f1, cn=Vijay Dattatraya Shinde
Date: 2018.06.13 13:10:32 +05'30'

( वि.द. शिंदे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
२) मा.मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव

३) मा.राज्यमंत्री ( ग्राम विकास ) खाजगी सचिव
४) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
५) मा.सचिव (ग्राम विकास व पंचायत राज ) यांचे स्वीय सहायक
६) सर्व विभागीय आयुक्त.
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,पालघर/परभणी/नंदूरबार/सांगली/लातूर/रायगड/चंद्रपूर.
८) मुख्य लेखा व वित्त अधिकारी जिल्हा परिषद,पालघर/परभणी/नंदूरबार/सांगली/लातूर/रायगड/चंद्रपूर.
९) महालेखापाल- १ /२, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
१०) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
११) संबंधित अधिकारी (संबधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्यामार्फत)
१२) सामान्य प्रशासन विभाग, (कार्यासन-१२/कार्यासन-१६ ब), मंत्रालय, मुंबई
१३) कार्यासन क्रमांक आस्था-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१४) निवड नस्ती, का.क्र. आस्था-३, ग्राम विकास व जलसंधारण विभाग